**गोखले अर्थशास्त्र व राज्यशास्त्र संस्था, पुणे व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठांतील शिक्षकिय व शिक्षक समकक्ष पदांना करिअर ॲडव्हान्समेंट स्कीम (Career Advancement Scheme)लागू करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः जीपीआय-२०१२/(१९६/१२ )/विशि-४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०३ एप्रिल, २०१७

वाचा:-

1. **शासन निर्णय क्र.NGC २००९/(२४३/०९)/Uni-१, दि.१२/८/२००९.**
2. **शासन पत्र क्र.डिसीआय/१०९९(६४/९९)/विशि-१, दि.३१/८/२००२.**
3. **शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०११/(२५/११)/विशि-१, दि. १५/२/२०११.**
4. **शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१०/(१९६/१०)/विशि-४, दि.२४/६/२०११.**
5. **शासन निर्णय क्र. टिमवि-२००८/(२३२/०९)/विशि-४, दि.२७/८/२०११.**

**प्रस्तावना:**

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील अकृषी विद्यापीठातील शिक्षकिय पदांना विद्यापीठ अनुदान आयोगाच्या शिफारशीनुसार ६ वा वेतन लागू करण्यात आला आहे. तसेच, शासन निर्णय क्र. संकिर्ण २०११/(२५/११)/विशि-१, दि.१५/२/२०११ नुसार विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दि.३० जून, २०१० च्या अधिसूचनेतील शिफारसी राज्यातील अकृषी विद्यापीठे व संलग्नीत महाविद्यालयातील शिक्षकीय व शिक्षक समकक्ष पदांना लागू करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयानुसार सर्व अकृषी विद्यापीठातील शिक्षकीय व शिक्षक समकक्ष पदांना करिअर ॲडव्हान्समेंट स्कीम (Career Advancement Scheme) ही लागू करण्यात आली आहे.गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे या संस्थेतील २७ शिक्षकिय पदांना संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठास संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये सहाव्या वेतन आयोगाच्या सुधारित वेतनश्रेण्या शासन निर्णय क्र.एनजीसी २००९/(२४३/०९)/युएनआय-१, दि.१२ ऑगस्ट, २००९ मधील तरतूदीनुसार दि.१ जानेवारी, २००६ पासून लागू करण्यास मान्यता देण्यात आली आहे. गोखले अर्थशास्त्र व राज्यशास्त्र संस्था, पुणे व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठातील शिक्षकीय व शिक्षक समकक्ष पदांना करिअर ॲडव्हान्समेंट स्कीम (Career Advancement Scheme) लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठातील राज्य शासन अनुदानीत शिक्षकीय व शिक्षक समकक्ष पदांना संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१२ ऑगस्ट, २००९ व संदर्भाधीन क्र.३ येथील दि. १५ फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये करिअर

ॲडव्हान्समेंट स्कीम संदर्भातील विहित केलेल्या अर्हता, पात्रता, नियम व अटींच्या अधीन राहून करिअर ॲडव्हान्समेंट स्कीम लागू करण्यात येत आहे.

२. गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था,पुणे व टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे अभिमत विद्यापीठातील ज्या शिक्षकांनी विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी विहित केलेल्या व शासनाने स्विकारलेल्या अर्हता, पात्रता धारण केलेल्या आहेत,अशा पूर्णवेळ शिक्षक व शिक्षक समकक्ष पदांना करिअर ॲडव्हान्समेंट स्कीम लागू राहील. पात्र शिक्षक व शिक्षक समकक्ष यांची वेतन निश्चिती संदर्भ क्र. १ येथील दि.१२ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयानुसार करावी व त्यास संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांची मान्यता घ्यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.११/२०१७/सेवा-९, दिनांक ६ फेब्रुवारी, २०१७ नुसार त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०४०३१५०८४७६५०८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.04.03 15:10:53 +05'30'

**(सिध्दार्थ खरात)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक, गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे
३. कुलगुरू, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे.
४. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महालेखापाल-१, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. मा.मंत्री,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.राज्यमंत्री,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग, सेवा-९, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (विशि-४).